महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ
जिल्हा शल्य चिकित्सक संवर्गातील बदली
/ पदस्थापना ....

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली-१३१५/प्र.क्र.३५/सेवा-२**
गो.ते.रुग्णालय इमारत संकुल, १० वा मजला, ए विंग,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख : ०३ जुलै, २०१५

**संदर्भ :** सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. नामनि-१२१३/प्र.क्र.४६१/सेवा-२,
दि.१८ नोव्हेंबर, २०१३.

**आदेश:**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील जिल्हा शल्य चिकित्सक संवर्गातील खालील वैद्यकीय अधिकाऱ्यांना संदर्भाधीन आदेशान्वये नामनिर्देशनाने नियुक्ती देण्यात आली आहे. सदर नियुक्तीवेळी त्यांना वाटप झालेला महसुली विभाग बदलून मिळण्याबाबत त्यांनी विनंती केली. त्यानुसार सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक १७/२/२००७ अन्वये गठीत अपर मुख्य सचिव(गृह) यांच्या अध्यक्षतेखालील स्थापन केलेल्या समितीने वाटप झालेला महसुली विभाग बदलून देण्यास दिनांक १८/४/२०१५ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेने आणि महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदींनुसार आता खाली दर्शविण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या वाटप झालेल्या महसूली विभागात बदल करुन पुढीलप्रमाणे पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नांव | सध्याची पदस्थापना व महसुली विभाग | सुधारीत पदस्थापना व महसुली विभाग |
|---|---|---|---|
| १ | डॉ.अशोक रा. बडे | वैद्यकीय अधीक्षक,<br>ग्रामीण रुग्णालय, पुलगांव,<br>जि. वर्धा ( नागपूर विभाग) | वैद्यकीय अधीक्षक,<br>ग्रामीण रुग्णालय, कासारशिरसी,<br>ता. निलंगा, जि. लातूर<br>(औरंगाबाद विभाग) |
| २ | डॉ. माधव कनकवळे | वैद्यकीय अधीक्षक,<br>उप जिल्हा रुग्णालय, आर्वी,<br>जि. वर्धा ( नागपूर विभाग) | वैद्यकीय अधीक्षक,<br>ग्रामीण रुग्णालय, चाकण, जि. पुणे<br>(पुणे विभाग) |

२. सदर अधिकाऱ्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरीता पर्यवेक्षकीय अधिकाऱ्यांनी तात्काळ कार्यमुक्त करावे आणि संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ हजर होवून त्याबाबतचा अहवाल संचालक, आरोग्य सेवा, मुंबई, संबंधित उपसंचालक व शासनास सादर करावा.

३. संबंधित अधिकाऱ्यांपैकी त्यांनी दिलेल्या पसंतीक्रमानुसार विभागीय संवर्ग वाटप झाले नाही, असे अधिकारी त्या विभागीय संवर्गात रुजू झाल्यावर, त्याअनुषंगाने पदग्रहण अवधी, बदली अनुदान, प्रवासखर्च, प्रवासभत्ता इत्यादी मंजूर केले असल्यास, त्या अधिकाऱ्यांना आता त्या सवलतींचा लाभ पुन्हा अनुदेय होणार नाही.

४. हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

५. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०७०३१६०६२४७८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO

Digitally signed by GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO
DN: CN = GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC HEALTH,CID - 918117
Date: 2015.07.03 16:48:35 +05'30'

(वि. पुं. घोडके)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
२) सहसंचालक, आरोग्य सेवा(अर्थ व प्रशासन), मुंबई
३) उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर / लातूर मंडळ, लातूर/ पूणे मंडळ, पूणे
४) जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, वर्धा/ लातूर/ पुणे,
५) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२,नागपूर
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२,नागपूर
७) जिल्हा कोषागार अधिकारी, वर्धा/ लातूर/ पुणे
८) कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग कार्यासन-१२, मंत्रालय,मुंबई
९) डॉ.अशोक रा बडे, वैद्यकीय अधीक्षक, ग्रामीण रुग्णालय, पुलगांव, जि. वर्धा
१०) डॉ. माधव कनकवळे, वैद्यकीय अधीक्षक, उप जिल्हा रुग्णालय, आर्वी, जि. वर्धा
११) निवडनस्ती